**महाराष्ट्र राज्यात संरक्षण विभागाच्या जमिनीची अधिकार अभिलेखात नोंद घेताना ती नोंद केवळ "भारत सरकार, संरक्षण मंत्रालय" अशीच घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः जमीन- ०४/२०१४/प्र.क्र.९०/ज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक: **३० एप्रिल, २०१५**

**वाचा:-**

**(१)** प्रधान संचालक, डिफेन्स इस्टेट यांचे पत्र क्र.९०६३/अे/कल्याण/एलसी-२/डीई, दिनांक १०.४.२०१४
**(२)** महानिदेशक, रक्षा संपदा महानिदेशालय, रक्षा मंत्रालय, भारत सरकार यांचे अ.शा.पत्र क्र.७०१/संकीर्ण/आरडी/डीई/२०१३, दिनांक २६.८.२०१४.
**(३)** अप्पर सचिव, रक्षा मंत्रालय, भारत सरकार यांचे अ.शा.पत्र क्र.७०१/संकीर्ण/आरडी/डीई /२०१३, दिनांक १६.९.२०१४
**(४)** प्रधान निदेशक, प्रधान निदेशालय, रक्षा संपदा, रक्षा मंत्रालय, दक्षिण कमान, पुणे यांचे अ.शा.प.क्र.१६९२५/जमीन/डीई/१, दिनांक २१.१०.२०१४
**(५)** अप्पर महानिदेशक रक्षा मंत्रालय, भारत सरकार यांचे अ.शा.पत्रक्र.७०१/संकीर्ण /आरडी/डीई/२०१३, दिनांक १९.१२.२०१४

**प्रस्तावना:-**

"महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६" मधील तरतूदी व त्याखालील "महाराष्ट्र जमीन महसूल अधिकार अभिलेख आणि नोंदवह्या (तयार करणे व सुस्थितीत ठेवणे) नियम १९७१", नुसार विहीत केलेल्या कार्यवाहीचा अवलंब करुन अधिकार अभिलेखविषयक नोंदी घेण्यात येतात. राज्याच्या विविध जिल्ह्यात संरक्षण दलाच्या मालकीच्या जमिनी आहेत. या जमिनीपैकी बऱ्याच ठिकाणच्या जमिनीच्या अधिकार अभिलेख्यात संरक्षण मंत्रालयाच्या नावाच्या नोंदी अद्याप झालेल्या नाहीत. यासंदर्भात संरक्षण मंत्रालयाने संदर्भाधीन पत्रान्वये उपलब्ध केलेला, याबाबतचा तपशील सोबत जोडला आहे. या जमिनीच्या अधिकार अभिलेखात संरक्षण मंत्रालयाच्या नावा विषयी नोंदी सत्वर होण्याची आवश्यकता संरक्षण मंत्रालयाच्या संबंधित अधिकारी यांनी विशद केली आहे. संरक्षण मंत्रालयाच्या डिफेन्स इस्टेट ऑफीसर्सच्या तीन परिक्षेत्र कार्यालयांच्या कार्यकक्षेत राज्यातील विविध जिल्हे येत असून, त्याबाबतचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

(१) **डिफेन्स इस्टेट ऑफिसर, मुंबई:-** मुंबई शहर, मुंबई उपनगर, रायगड,ठाणे, नाशिक, नागपूर, जळगांव आणि वर्धा
(२) **डिफेन्स इस्टेट ऑफिसर, पुणे:-** अहमदनगर, औरंगाबाद, पुणे,कोल्हापूर, सातारा, सांगली, रत्नागिरी आणि सिंधुदुर्ग
(३) **डिफेन्स इस्टेट ऑफिसर, सिंकदराबाद:-** अमरावती, अकोला, बुलढाणा, यवतमाळ, चंद्रपूर, भंडारा, जळगांव, नांदेड, परभणी,बीड, उस्मानाबाद आणि सोलापूर.

या पार्श्वभूमीवर, राज्यातील विविध जिल्ह्यात संरक्षण मंत्रालयाच्या जमिनीविषयक प्रलंबित फेरफार नोंदी अधिनियम व नियम यातील तरतूदीस अनुसरुन सत्वर घेण्याच्या उद्देशाने क्षेत्रिय स्तरावरील महसूल प्राधिकारी/ अधिकारी यांना सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन परिपत्रक :-**

"महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६" मधील तरतूदी व त्याखालील, "महाराष्ट्र जमीन महसूल अधिकार अभिलेख आणि नोंदवह्या (तयार करणे व सुस्थितीत ठेवणे) नियम १९७१" नुसार विहीत केलेल्या कार्यवाहीचा अवलंब करुन भारतीय संरक्षण दलाच्या मालकीच्या ज्या जमिनींच्या मालकी हक्काविषयक नोंदी अद्याप अधिकार अभिलेख्यात झालेल्या नाहीत, किंवा प्रलंबित आहेत. त्या सत्वर करणे आवश्यक असून, त्या अनुषंगाने सर्व क्षेत्रीय महसुली प्राधिकारी यांना निर्देशित करण्यात येते की:-

(१) संरक्षण मंत्रालयाच्या ज्या जमिनीच्या अधिकार अभिलेखात त्यांच्या मालकी हक्काविषयी नोंद घेणे प्रलंबित आहे, अशा प्रकरणी सदर नोंद घेताना यापुढे ती केवळ **"भारत सरकार, संरक्षण मंत्रालय"** अशीच घेण्यात यावी.

(२) तसेच, अधिकार अभिलेख्याच्या बाबतीतील नोंदी करताना, "महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६" मधील तरतूदी व त्याखालील "महाराष्ट्र जमीन महसूल अधिकार अभिलेख आणि नोंदवह्या (तयार करणे व सुस्थितीत ठेवणे) नियम, १९७१" नुसार विहीत केलेली प्रक्रिया अवलंबवून संरक्षण मंत्रालयाच्या ज्या जमिनीच्या संदर्भात फेरफेरांच्या नोंदी प्रलंबित असतील, त्या सत्वर घेण्यात याव्यात.

(३) संरक्षण मंत्रालयाच्या ज्या जमिनीच्या अधिकार अभिलेखात भोगवटा/मालकी हक्काविषयी सरंक्षण मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सेवा किंवा आस्थापना यांच्या नावाने नोंद यापूर्वीच घेण्यात आलेली आहे, त्यामध्ये कोणताही बदल करण्यात येऊ नये.

(४) संरक्षण मंत्रालयाच्या जमिनीविषयक बाबी संबंधी काही अडचण किंवा संदिग्धता असल्यास, त्याबाबत आपल्या जिल्ह्याशी संबंधित उक्त प्रस्तावनेत नमूद डिफेन्स इस्टेट ऑफिसर, यांच्याशी पत्रव्यवहार करण्यात यावा.

०२. सर्व जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या जिल्ह्यातील, संरक्षण मंत्रालयाच्या जमिनीच्या संदर्भात अधिकार अभिलेखात मालकी हक्काविषयक नोंदी घेण्यासाठी प्रलंबित असलेल्या प्रकरणांचा मासिक बैठकीमध्ये आढावा घ्यावा.

०३. सर्व जिल्हाधिकारी व क्षेत्रीय महसुली प्राधिकारी यांनी या निर्देशाची तात्काळ अंमलबजावणी करावी.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१५०४३०१६५५०४०७१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil S Kothekar

Digitally signed by Sunil S Kothekar
DN: CN = Sunil S Kothekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.13 15:36:12 +05'30'

**सुनिल कोठेकर**
**अवर सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.

२) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.

३) मा.मुख्य सचिव, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव (महसूल) यांचे वि.का.अ./स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.

५) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय यांचे स्वीय सहायक, विधानभवन, मुंबई-३२

६) सर्व विभागीय आयुक्त,

७) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.

८) सर्व जिल्हाधिकारी / अपर जिल्हाधिकारी,

९) सर्व तहसिलदार

१०) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य,(१) मुंबई.

११) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य,(२) नागपूर

१२) महानिर्देशक, रक्षा मंत्रालय, भारत सरकार, रक्ष संपदा महानिदेशालय, रक्षा संपदा भवन,नवी दिल्ली-१०

१३) अपर महानिर्देशक,रक्षा मंत्रालय,भारत सरकार,रक्ष संपदा महानिदेशालय,रक्षा संपदा भवन,नवी दिल्ली-१०

१४) "ज" समूहातील सर्व कार्यासने/उपसचिव/सहसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) प्रधान संचालक, डिफेन्स इस्टेट, प्रधान संचालनालय, डिफेन्स इस्टेट, साऊर्दन कमांड, माणिकजी मेहता रोड, पुणे कॅन्टोनमेंट-४११००१.

१६) विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई-३२

१७) माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२

१८) निवडनस्ती, कार्यासन-ज-१, महसूल व वन विभाग.

## शासन परिपत्रक क्र.जमीन-०४/२०१४/प्र.क्र.६०/ज-१, दि.३० एप्रिल, २०१५ सोबतचे परिशिष्ट-१

| **Total Defence Land in the State (In acres)** | **Total Defence Land not mutated in State Revenue Records (In acres)** | **% of land not mutated** | **Name of DEO/ADEO** | **District-wise details of Defence Land not** | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | **District** | | **Defence Land not mutated in State Revenue Records (In acres)** |
| 138,802.102 | 16,580.637 | 11.95% | Mumbai | 1 | Mumbai | 190.566 |
| | | | | 2 | Raigad | 178.684 |
| | | | | 3 | Thane | 26.846 |
| | | | | 4 | Nashik | 14.820 |
| | | | | 5 | Nagpur | 951.477 |
| | | | | 6 | Jalgaon | 0.850 |
| | | | | | **Total** | 1,363.243 |
| | | | Secunderabad | 7 | Akola | 512.205 |
| | | | | 8 | Amravati | 582.270 |
| | | | | 9 | Bhandara | 5,890.550 |
| | | | | 10 | Chandrapur | 7,517.910 |
| | | | | 11 | Jalgaon | 303.900 |
| | | | | 12 | Nagpur | 242.690 |
| | | | | 13 | Solapur | 49.400 |
| | | | | 14 | Wardha | 49.080 |
| | | | | 15 | Yavatmal | 39.900 |
| | | | | | **Total** | 15,187.905 |
| | | | Pune | 16 | Pune | 29.489 |